**जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत राबवावयाच्या 'शासकीय महाविद्यालयांचा विकास' जिल्हास्तरीय योजनेबाबत ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व नागपूर या संस्थेसाठीच्या मार्गदर्शक सूचना**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग**
**क्र. एमएलआय ११२३/प्र.क्र. १८५/कामगार-६**
हुतात्मा राजगुरू चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२,
दिनांक- १९ जुलै, २०२४

**वाचाः** १) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/(३२०/१५)/मशि-३. दि.२९/१२/२०१६.
२) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र. ७५/मशि-३, दि. ०६ जून २०२४.

**प्रस्तावना:**

उच्च शिक्षण संचालनालयाच्या अंतर्गत येत असलेल्या शासकीय संस्था/महाविद्यालये यामधीलबांधकामे तसेच प्रयोगशाळा उपकरणे व साधनसामुग्री खरेदी तसेच आधुनिकीकरणाची कामे करण्यासाठीजिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण) अंतर्गत "शासकीय महाविद्यालयांचा विकास" या जिल्हास्तरीय योजनेतून निधी उलब्ध करुन दिला जातो.

सदर योजनेसाठी उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि.२९/१२/२०१६ शासन निर्णयामध्ये समावेश केलेल्या महाविद्यालयीन संस्थेच्या यादीमध्ये उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागा अंतर्गत कार्यरत १) ना.मे लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व २) ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर या दोन्ही संस्थांचा समावेश दि.०६ जून, २०२४ च्या शासन निर्णयांन्वये करण्यात आला आहे. या दोन संस्थाही उद्योग, ऊर्जा कामगार व खनिकर्म विभागाच्या अधिनस्त असल्याने, योजनेच्या अंमलबजावणीच्या अनुषंगाने आवश्यक त्या मार्गदर्शक सूचना व निकष स्वतंत्रपणे विहित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभागाच्या अंतर्गत कार्यरत ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व नागपूर येथील बांधकामे, शैक्षणिक उपकरणे व अनुषंगिक साधनसामुग्री तसेच फर्निचर, खेळाचे साहित्य, स्वच्छ पाणीपुरवठा, विद्युत उपकरणे, सोलार, e-library Modules digital & on Screen reading book ऑनलाईन जर्नल Subscription, आधुनिकीकरणाची कामे करण्यासाठी जिल्हा वार्षिक योजना (सर्वसाधारण योजना) अंतर्गत 'शासकीय महाविद्यालयांचा विकास' या जिल्हास्तरीय योजनेतून निधी उपलब्ध करुन देण्यात येत आहे.

उपरोक्त बांधकामे तसेच उपकरणे, साधनसामुग्री खरेदीसाठी खालील उद्दिष्टाखाली तरतुदींची मागणी जिल्हा नियोजन समितीकडे करण्यात यावी.

| अ.क्र. | लेखाशीर्ष | उद्दिष्ट | बांधकामे व खरेदीबाबत तपशील |
|---|---|---|---|
| १. | २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३ विद्यापीठ व उच्च शिक्षण, १०३ शासकीय महाविद्यालय व संस्था, जिल्हा योजना, शासकीय महाविद्यालयांचा विकास, १३ कार्यालयीन खर्च ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री २१ पुरवठा व सामुग्री २७ लहान बांधकामे | १३ कार्यालयीन खर्च | शासकीय महाविद्यालय/संस्थांसाठी आवश्यक असणारी उपकरणे साधनसामुग्री, ग्रंथालयासाठी नवीन संदर्भ ग्रंथ व पुस्तके. |
| २. | | ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री | प्रयोगशाळा उपकरणे व साधनसामुग्री |
| ३. | | २१ पुरवठा व सामुग्री | प्रयोगशाळांमध्ये आवश्यक असणारी उपभोग्य साधनसामुग्री व सामान |
| ४. | | २७ लहान बांधकामे | शासकीय महाविद्यालय/संस्था यांच्या इमारतीचे बाह्य सुशोभिकरण, इमारत दुरुस्ती, क्रिडांगण, पायाभूत सुविधा, पिण्याचे पाणी व्यवस्था, प्रसाधनगृह बांधणे, वृक्षारोपण, झाडाचे संगोपन, परिसर विकासाची कामे, सोलार उपकरणे, व्हर्चुअल क्लासरूमची निर्मिती. |
| ५. | ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ०१ कार्यालयीन इमारती, ०५१ बांधकामे, जिल्हा योजना, मोठी बांधकामे, जिल्हा प्रशासन -५३ मोठी बांधकामे | ५३, बांधकामे | शासकीय महाविद्यालय / संस्था यासाठी नवीन इमारतीचे बांधकाम, अस्तित्वात असलेल्या इमारतीचे विस्तारीकरण/ नुतनीकरण, नविन प्रयोगशाळा, इमारत बांधकाम. |

या योजनेमध्ये महसूली व भांडवली खर्च होईल. त्यांचे लेखाशिर्ष खालीलप्रमाणे आहे.

**महसूली खर्च लेखाशिर्ष:** २२०२ सर्वसाधारण शिक्षण, ०३ विद्यापीठ व उच्च शिक्षण, १०३ शासकीय महाविदयालय व संस्था, जिल्हा योजना, शासकीय महाविद्यालयांचा विकास-१३ कार्यालयीन खर्च, ५२ यंत्रसामुग्री व साधनसामुग्री, २१ पुरवठा व सामुग्री, २७ लहान बांधकामे

**भांडवली खर्च लेखाशिर्ष:** ४०५९ सार्वजनिक बांधकामावरील भांडवली खर्च, ०१ कार्यालयीन इमारती, ०५१ बांधकामे, जिल्हा योजना, मोठी बांधकामे, जिल्हा प्रशासन- ५३ मोठी बांधकामे.

सदर योजनेच्या अंमलबजावणीसाठी खालीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्यात येत आहेत.

१. ना.मे.लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व नागपूर यांनी जिल्हा वार्षिक योजनेतून निधी उपलब्धतेबाबत संबंधित जिल्हा नियोजन समितीकडे विहित वेळेत तरतुदीची मागणी करावी यामध्ये शैक्षणिक संसाधने, बांधकामे व इतर अनुषंगिक साधनसामुग्री यांना प्राधान्य देण्यात यावे.

२. जिल्हा वार्षिक योजनेतून मंजूर केलेल्या निधीतून करावयाची विकास कामे तसेच साधनसामुग्री खरेदी प्रस्ताव प्रशासकीय मंजूरीस्तव संबंधित जिल्हा नियोजन समितीकडे सादर करावेत. संदर्भाधीन दि.२९/१२/२०१६ च्या शासन निर्णयानुसार प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार संबंधीत जिल्हाधिकारी यांना आहेत.

३. मुंबई व नागपूर येथील दोन्ही संस्थांच्या प्रस्तावांना तांत्रिक मान्यता देण्याचे अधिकार संचालक, ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था यांना राहतील.

४. जिल्हा नियोजन समितीच्या निधीतून करावयाची विकासकामे तसेच उपकरणे व साधनसामुग्रीची खरेदी ही विद्यार्थ्यांच्या अभ्यासक्रमास पूरक असतील.

५. सार्वजनिक बांधकाम विभाग (स्थापत्य व विद्युत) यांच्याकडून आराखडा व अंदाजपत्रक घेऊन प्रस्ताव जिल्हा नियोजन समितीकडे सादर करावेत.

६. उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाचा शासन निर्णय क्र. भांखस-२०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४ दि.०१/१२/२०१६ अन्वये, विहित केलेल्या नियमानुसार खरेदी प्रक्रिया राबविण्यात यावी.

७. राज्य योजनेतून करण्यात येणारी कामे आणि जिल्हा वार्षिक योजनेतून होणारी कामे ही वेगवेगळी असावीत. एकाच कामासाठी दोन योजनांचा निधी वापरण्यात येऊ नये.

८. जिल्हा वार्षिक योजनेतून बांधकामे व खरेदी करताना त्यासाठी शासनाने ठरवून दिलेले सर्व नियम, निकष पध्दती व शासनाचे वेळोवेळी होणारे बदल बंधनकारक राहतील.

९. या योजनेतील बांधकामे २ वर्षाच्या कालावधीत पूर्ण करण्यात यावीत. त्या अनुषंगाने कामाचे नियोजन व निधीची तरतूद करण्यात यावी.

१०. या योजनेवर होणा-या खर्चाचा हिशेब स्वतंत्रपणे ठेवण्यात यावा. त्या अनुषंगाने कामाचे नियोजन व निधीची तरतूद करण्यात यावी.

११. अपूर्ण कामाची कामनिहाय माहिती व शिल्लक असलेल्या निधीची सविस्तर माहिती संबंधित जिल्हा नियोजन समितीकडे कार्यान्वयीन कार्यालयाने सादर करावी. अपूर्ण कामे प्राधान्याने पूर्ण करण्यात यावीत.

१२. ग्रंथ/पुस्तके खरेदी करताना त्यासंबंधीच्या नेहमीच्या कार्यपध्दती विषयक नियमांचे व सर्वसाधारण निर्देशांचे पालन करण्यात यावे.

१३. सर्वसाधारण जिल्हा वार्षिक योजनांच्या खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र काम पूर्ण झाल्यानंतर जिल्हा नियोजन समितीला सादर करावे.

१४. या योजनेतील खर्च संबंधित जिल्हा नियोजन समितीने विहित केलेल्या लेखाशिर्षाखाली टाकण्यात यावा.

१५. ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई व नागपूर यांचे आहरण व संवितरण अधिकारी हे जिल्हा नियोजन समितीचे काम पाहतील. तसेच संचालक, ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई हे नियंत्रण अधिकारी असतील.

सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२४०७१९१३२२०५२५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS

Digitally signed by SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, 2.5.4.20=3389518a88af500ef17fd52858804c56d5b0db93ce68c963 8764849614f0c8b3, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=824DB7B32ED13AAC7B6F1F11E717770B52D6784F 2BC41DDF0E4E9729CDB96F88, cn=SWAPNIL YASHWANTRAO KAPADNIS
Date: 2024.07.19 17:39:42 +05'30'

**( स्वप्निल कापडणीस )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा. मंत्री (उच्च व तंत्रशिक्षण विभाग), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) प्रधान सचिव (कामगार), उद्योग, ऊर्जा, कामगार व खनिकर्म विभाग, मंत्रालय, मुंबई.
४) कामगार आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.

५) संबंधीत जिल्हाधिकारी तथा सचिव, जिल्हा नियोजन समिती, मुंबई/नागपूर
६) संचालक,  ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, मुंबई
७) उपसंचालक, ना.मे. लोखंडे महाराष्ट्र श्रम विज्ञान संस्था, नागपूर
८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
९) जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.